**बळीराजा जलसंजीवनी योजनेतील NIDA अंतर्गत कर्ज मंजूर केलेल्या जलसंपदा विभागाच्या ६८ सिंचन प्रकल्पांवर देखरेख (MONITORING) करण्यासाठी समन्वय अधिकारी (Nodal Officer) म्हणून मुख्य अभियंता, नागपूर यांची नियुक्ती करण्याबाबत...**

# महाराष्ट्र शासन

## जलसंपदा विभाग

**शासन परिपत्रक क्रमांक : संकिर्ण २०२१/प्र.क्र.१८०/निवसं-१**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : ०२ फेब्रुवारी, २०२२.

वाचा :-१) वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक नाबार्ड-२०१६/प्र.क्र.५७/अर्थबळ दि.२९.१२.२०१६.

२) वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक नाबार्ड-२०१८/प्र.क्र.७८/अर्थबळ दि.३.४.२०१९.

३) वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक नाबार्ड-२०२०/प्र.क्र.४१/अर्थबळ दि.१३.१०.२०२०.

**परिपत्रक**

विदर्भ व मराठवाड्यातील आत्महत्याग्रस्त जिल्ह्यातील व उर्वरीत महाराष्ट्रातील दुष्काळग्रस्त जिल्ह्यातील जलसंपदा विभागाच्या ९१ सिंचन प्रकल्पांना विशेष पॅकेज अंतर्गत केंद्रिय अर्थसहाय्य देण्यास केंद्र शासनाने दि.३० जुलै, २०१८ च्या ज्ञापनान्वये मंजूरी दिलेली आहे. त्यानुसार राज्यातील ९१ सिंचन प्रकल्प पूर्ण करण्यासाठी केंद्र शासनाने दिलेल्या विशेष पॅकेजच्या योजनेस दि.१.१.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये "बळीराजा जलसंजीवनी योजना" असे संबोधण्यास मान्यता देण्यात आली आहे.

२. या योजनेतंर्गत प्रकल्पांच्या उर्वरीत किंमतीच्या २५% हिस्सा केंद्र शासन व उर्वरीत ७५% हिस्सा राज्य शासनाचा राहणार आहे. केंद्र शासनाच्या सूचनेनुसार बळीराजा जलसंजीवनी योजनेतील प्रकल्पांना विशेष पॅकेज अंतर्गत नाबार्ड कडून राज्य शासनाच्या हिश्श्यापोटी रक्कम रू.१०२३८.७० कोटी कर्जाद्वारे उपलब्ध होणार असून त्यास मा.मंत्रिमंडळाने दि.१६.१०.२०१८ रोजी मंजूरी दिली आहे. राज्य शासनाच्या हिश्श्याचे कर्ज नाबार्ड कडून घेताना ते RIDF व NIDA अंतर्गत ३५:६५ या प्रमाणात घेण्यात येणार आहे. त्यानुसार RIDF अंतर्गत रु.३५८३.५५ कोटी व NIDA अंतर्गत रु.६६५५.१५ कोटी इतके कर्ज नाबार्ड कडून उपलब्ध होणार आहे. त्या अनुषंगाने राज्य शासन व नाबार्ड यांच्यामध्ये दि.६.३.२०१९ रोजी सामंजस्य करार (MoA) करण्यात आला आहे.

३. RIDF अंतर्गत प्रकल्पांकरिता मिळणाऱ्या कर्जाच्या बाबतीत वित्त विभागाद्वारे नोडल अधिकारी म्हणून संचालक, लेखा व कोषागारे, पुणे यांची नियुक्ती संदर्भ क्र.(२) येथे नमूद शासन निर्णयान्वये करण्यात आली आहे. उपरोक्त कर्जाच्या समन्वयासाठी समन्वय अधिकारी ग्रामीण पाटबंधारे विकास निधी प्रकल्प तथा मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, सिंचन सेवा भवन, सिव्हिल लाईन्स, नागपूर यांची नियुक्ती केली आहे. क्षेत्रीय स्तरावरील तसेच कार्यक्रमाच्या अंमलबजावणी संबंधी सर्व जबाबदारी समन्वय अधिकारी यांची राहील.

४. संदर्भ क्र.(२) येथील शासन निर्णयान्वये NIDA अंतर्गत प्रकल्पांकरिता मिळणाऱ्या कर्जाच्या बाबतीत वित्त विभागाद्वारे "नोडल अधिकारी" म्हणून संचालक, लेखा व कोषागारे, पुणे यांची नियुक्ती करण्यात आली आहे.

उपरोक्त कर्जाच्या समन्वयासाठी उपसचिव (निवसं १), जलसंपदा विभाग यांची समन्वय अधिकारी म्हणून नेमणूक केली आहे.

५. RIDF व NIDA अंतर्गत मिळणारे कर्ज हे बळीराजा जलसंजीवनी योजनेतील राज्य हिश्श्यासाठी उपलब्ध होत असल्याने समन्वयामध्ये एकसूत्रता राहण्याच्या दृष्टिकोनातून व प्रभावीपणे सनियंत्रण करण्यासाठी RIDF प्रमाणेच NIDA अंतर्गत मिळणाऱ्या कर्जाच्या समन्वयासाठी सुध्दा **समन्वय अधिकारी** म्हणून मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, सिंचन सेवा भवन, सिव्हिल लाईन्स, नागपूर यांची नियुक्ती करण्यात येत आहे. शासन स्तरावर समन्वय अधिकारी उपसचिव (निवसं) जलसंपदा विभाग हे राहतील.

६. समन्वय अधिकारी (Nodal Officer) यांच्या जबाबदाऱ्या व कर्तव्ये खालीलप्रमाणे राहतील :-

१. क्षेत्रीय स्तरावरील कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसंबंधीची सर्व जबाबदारी समन्वय अधिकारी म्हणून मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, सिंचन भवन, सिव्हिल लाईन्स, नागपूर यांची राहील.

२. बळीराजा जलसंजीवनी योजनेतील RIDF व NIDA अंतर्गत कर्ज मंजूर केलेल्या प्रकल्पांचे DRAWAL APPLICATION प्राथम्याने सादर करण्याची जबाबदारी समन्वय अधिकारी यांची राहील.

३. तसेच प्रकल्पांच्या काम पूर्णत्वाचे प्रमाणपत्र (Completion Certificate) शासनास त्वरीत सादर करण्याची जबाबदारी समन्वय अधिकारी यांची राहील.

७. **बळीराजा जलसंजीवनी योजनेतील प्रकल्पांसाठी नाबार्ड NIDA च्या माध्यमातून जे कर्ज प्राप्त होत** आहे. त्यासाठी आवश्यक ते मागणीपत्र (Drawal Application) वित्त विभागास सादर करण्याची जबाबदारी पूर्वीप्रमाणेच जलसंपदा विभागाची राहील.

८. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०२०२१२२०३२०९२७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHAILA BABAN YADAV

Digitally signed by SHAILA BABAN YADAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a022aa350b02721b783553b5f04e9a637bb746c09f7ca3701d55e5feb1b5b141, pseudonym=D9E9BF2549554875691C6300C3F682524A1406B3, serialNumber=01B315F80D517C9B1A66011D10F7F68624DB9044C98A741CFD0A1AEF85A9F714, cn=SHAILA BABAN YADAV
Date: 2022.02.02 12:22:30 +05'30'

**( शैला ब. यादव )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. प्रधान सचिव (वित्तीय सुधारणा), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३.सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
४.सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
५.सर्व कार्यकारी संचालक, पाटबंधारे विकास महामंडळे.
६.समन्वय अधिकारी तथा मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, सिंचन सेवा भवन, सिव्हिल लाईन्स,नागपूर.

७.सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई. (मुख्य अभियंता नागपूर वगळून)
८.आंतर वित्त सल्लागार तथा सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. उपसचिव (निवसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.कक्ष अधिकारी (अर्थबळ), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.निवसं-१ कार्यासन संग्रहार्थ.